शालेय शिक्षण व क्रीडा विभागात ई-गव्हर्नन्स प्रकल्पांतर्गत Science City च्या प्रकल्पासाठी E & Y च्या सल्लागारांचे सेवाशुल्क अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: ईगव्ह-०३२३/प्र.क्र.०६/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३१ मार्च, २०२३

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.मातसं ०८०/४/२०१४/-०/० माहिती व तंत्रज्ञान संचालनालय -DIT (MH), दिनांक ९ मे, २०१९
२) प्रकल्प अंमलबजावणी बैठक, दि.११.०५.२०२२
३) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आशिका/२०२३/ई-गव्ह/Sci.City/१४३/०१९४२, दि.२४ मार्च, २०२३.

**प्रस्तावना:-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने केंद्र पुरस्कृत योजनेतर्गत “भारतरत्न राजीव गांधी विज्ञान अविष्कार नगरी” (science city) हा प्रकल्प पिंपरी-चिंचवड येथे उभारण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने सदर प्रकल्पासाठी E & Y या कंपनीची Consulting Agency म्हणून निवड करण्यात आली आहे.

दि.११ मे, २०२२ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समिती बैठकीत बैठकीत E & Y कंपनीच्या सल्लागारांचे मानधन अदा करण्यास मान्यता देण्यात आली आहे. E & Y कंपनीचे सल्लागार डिसेंबर, २०२१ पासून सदर प्रयोजनासाठी कार्यरत आहेत. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी E & Y सल्लागारांचे डिसेंबर, २०२१ ते मे, २०२२ या कालवधीतील सेवा शुल्कापोटी रु.३९,७९,७९३/- देय निधीचे वितरण करण्याची मागणी संदर्भ क्र.३ अन्वये केली आहे. त्या अनुषंगाने E & Y सल्लागारांच्या सेवा शुल्कापोटी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी प्रस्तावित केल्यानुसार science city प्रकल्पासाठी E & Y सल्लागारांच्या सेवा शुल्कापोटी रु.३९,७९,७९३/- (एकोणचाळीस लाख एकोणऐंशी हजार सातशे त्र्यण्णव ) इतका निधी वितरीत करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च मागणी क्रमांक -ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२)(५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम (२२०२H४५४) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०२२-२३ च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. सहायक संचालक (लेखा) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदर निधी कोषागारातून आहरीत करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

३. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग-२ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४२२/व्यय-५, दिनांक ३०.०३.२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३११०००१५५४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2023.03.31 17:48:26 +05'30'

**(विवेक सपकाळ)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.अ.मु.स. वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.प्र.स.माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) महालेखापाल(लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
७) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
८) जिल्हा कोषागार अधिकारी,
९) निवडनस्ती/संगणक कार्यासन.